**पंचायत राज पोर्टलसाठी मे.कोठारी कॉम्प्युंटर्स यांना देयकाची रक्कम अदा करणेबाबत.**

महाराष्ट्र शासन
ग्राम विकास व जलसंधारण विभाग
शासन निर्णय क्रमांक- संकीर्ण२००८/प्र.क्र.८७८/वित्त-४
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२. दिनांक :२९ सप्टेंबर, २००९.

**वाचा:-** १) शासन निर्णय, ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्रमांक-बाविवि १००७/प्र.क्र.६९३/वित्त-४ दिनांक ६ जुलै २००७
२) शासन निर्णय ,ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्रमांक-बाविवि-१००७/प्र.क्र.६९३/वित्त-४, दिनांक ३ जून,२००८.
३) शासन निर्णय, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, क्रमांक-संकीर्ण २००८/प्र.क्र. ८७८/वित्त-४, दिनांक १० डिसेंबर २००८
४) शासन निर्णय ,ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्रमांक,बाविआ-२००९/प्र.क्र.९३६/वित्त-४ दिनांक ७ जानेवारी,२००९

**प्रस्तावना :-**

केंद्र शासनाच्या पंचायत राज मंत्रालयाने "पंचायत राज पोर्टल" राष्ट्रीय स्तरावर NIC मार्फत विकसीत केले असून त्यावर राज्यातील जिल्हा परिषद पंचायत समिती व ग्राम पंचायत स्तरापर्यंतची माहिती भरण्याबाबत सूचना दिल्या आहेत. त्या अंतर्गत राष्ट्रीय स्तरावर डाटाबेस निर्माण होणार आहे. पंचायत राज पोर्टलवर ही माहिती भरण्यासाठी मे.कोठारी कम्प्युटर्स पुणे यांची नियुक्ती करण्यात आली आहे. माहिती संकलीत करण्याच्या कार्यप्रणालीचे एकूण ७ टप्पे असून देयक अदा करण्याचे तीन टप्पे आहेत.आता देयक अदा करण्याच्या इंग्रजी टप्प्यातील ८,६४,१३० पृष्ठे संकलीत केल्याची,पडताळणी केल्याची व अपलोडींग केल्याची एकूण रु.१०,१४,१४,३१४ /- ची देयके मेसर्स कोठारी कम्प्युटर्स यांनी शासनास सादर केली आहेत. त्यापैकी रु.८,८७,७२,८८३ /- एवढी रक्कम पहिला हप्ता म्हणून मेसर्स कोठारी कम्प्युटर्स यांना अदा करावयाची आहे.

**शासन निर्णय :-**

मे.कोठारी कम्प्युटर्स यांचेसोबत झालेल्या करारानुसार त्यांनी सादर केलेल्या उपरोक्त देयकाच्या देय असलेल्या रक्कमेचा तपशील खालील प्रमाणे आहे.

| मुख्य टप्पा क्रमांक | देयकाची रक्कम | रक्कमेची टक्केवारी | देय रक्कम | सेवा कर @ १२.३६% | एकूण निव्वळ देय रक्कम (राऊंडड रुपयात ) |
|---|---|---|---|---|---|
| १ | ९०२५८३७८.५ | ५० टक्के | ४,५१,२९,१८९.२५ | ५५,७७,९६७.७९ | रु. ५,०७,०७,१५७/- |
| २ | ९०२५८३७८.५ | ४० टक्के | ३.६१.०३,३५१.४ | ४४६२३७४.२३ | रु. ४,०५,६५,७२६/- |
| ३ | ९०२५८३७८.५ | १० टक्के | ९०.२५.८३७.८५ | १,११५,५९३.५५ | रु. १,०१,४१,४३१ /- |
| | | | | **एकूण** | **रू.१०,१४,१४,३१४/-** |
| | | | | **निव्वळ देय रक्कम** | **८,८७,७२,८८३/-** |

२. **मे. कोठारी कम्प्युटर्स पुणे यांनी सादर केलेल्या वरील एकूण देयकापैकी रक्कम रु.** ८,८७,७२,८८३ /- इतका निधी पहिला हप्ता म्हणून **त्यांना सद्यस्थितीत देण्यात येत आहे. मुख्य कार्यकारी**

अधिकारी, पुणे यांनी संदर्भाधीन शासन निर्णय दिनांक ३ जून २००८ च्या वितरण आदेशात नमूद केल्याप्रमाणे व ७ जानेवारी,२००९ च्या वितरण आदेशात नमूद केल्याप्रमाणे पंचायत राज पोटर्लवरील माहितीचे संगणकीकरण करण्यासाठी त्यांच्या अधिनस्त राखून ठेवण्यात आलेल्या अनुक्रमे रु.४.८२ कोटी व १० कोटी निधी मधून वरील रक्कम रु. ८,८७,७२,८८३ /- ( अक्षरी आठ कोटी, सत्याऐंशी लक्ष, बहात्तर हजार, आठशे त्र्याऐंशी फक्त) पहिला हप्ता म्हणून मेसर्स कोठारी कम्प्युटर्स, पुणे या कंपनीस या संदर्भातील देयक व अनुषंगीक सर्व कागदपत्रे प्राप्त झाल्यावर, करारातील अटीनुसार नियमाप्रमाणे देयक दिनांकाच्या १५ दिवसाच्या आत अदा करण्याची असून त्याप्रमाणे त्वरीत कार्यवाही करावी व आपला अहवाल शासनास सत्वर सादर करावा. तसेच, या पुढे शासन आदेश देईल त्याप्रमाणे उर्वरीत निधी अदा करावयाचा आहे. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद पुणे यांनी, प्रदान झालेल्या तसेच अखर्चित रकमेचा हिशेब ठेवावा व प्रत्येक प्रदानांतर्गत त्याबाबतचा अहवाल शासनाकडे (ग्राम विकास व जलसंधारण विभाग-वित्त-४) वेळोवेळी सादर करावा.

३. पं.रा.३ कार्यासनाने संबंधित रकमेचे मूळ देयक, मे.कोठारी कम्प्युटर्स यांनी पंचायत राज पोर्टल मध्ये संकलित केलेल्या माहितीबाबत NIC चे वैज्ञानिक, श्री.गोंडाणे यांनी दिलेल्या प्रमाणपत्राची प्रत मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद पुणे यांना पाठवावी. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, पुणे यांनी सर्व बाबी तपासून मे.कोठारी कम्प्युटर्स यांना देय असलेल्या रकमेतून शासन नियमानुसार व करारनाम्यातील अटी व शर्तीनुसार सर्व कपाती (Deductions) करुन उर्वरित रक्कम मे.कोठारी कम्प्युटर्स यांना प्रदान करावी. वरील संबंधित रक्कमेचा पुणे येथे देय होणारा धनाकर्ष (Demand Draft) " **Bank of Maharashtra, Swargate Branch A/c Kothari Computers** " या नावाने त्वरीत काढण्यात यावा.

४. या बाबीवर होणारा खर्च मागणी क्र.एल-३, २५१५ - इतर ग्रामीण विकास कार्यक्रम, १०१ - पंचायती राज, ३१ - सहाय्यक अनुदाने, (०१) (१०) १२ व्या वित्त आयोगाच्या शिफारशीनुसार पंचायत राज संस्थांना विविध योजनांसाठी अनुदाने (योजनेतर) (२५१५०४६५) या लेखाशिर्षांतर्गत सन २००८-२००९ च्या मंजूर तरतुदीतून भागविण्यात यावा.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक 200909292016111001 असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( प्रतिभा मा.पाटील )
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रति,

महालेखापाल, महाराष्ट्र-१, लेखापरिक्षा, मुंबई.
विभागीय आयुक्त, पुणे विभाग, पुणे.
मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई.
उप मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, पुणे.
मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, पुणे.
मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद, पुणे.
जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.
मा.सचिव, (ग्राम विकास) यांचे स्वीय सहाय्यक.
श्री.बी.डी.गोंडाणे, शास्त्रज्ञ ब , राष्ट्रीय सूचना विज्ञान केंद्र (NIC) तिसरा मजला,मंत्रालय.
मे.कोठारी कॉम्प्युटर्स, ११७७ शुक्रवार पेठ, पुणे-२
अवर सचिव ,कार्यासन क्रमांक क्र.पंरा-३.ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय.
निवड नस्ती, कार्यासन क्र. वित्त -४ ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय.